किनवट जिल्हा नांदेड येथील गोदाम बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत. (सन- २०१९-२०)

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. गोदाबां-१०१४/प्र.क्र.७८६/नापु-१६-ब**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: १३ मार्च, २०२०.

<u>वाचा :-</u>

१) विभागाचा शासन निर्णय क्र.गोदाबां-१०१०/८७१/प्र.क्र.४३८/नापु १६, दि.०८ एप्रिल, २०११.

<u>प्रस्तावना :-</u>

उपरोक्त शासन निर्णयान्वये नांदेड जिल्ह्यातील किनवट येथे सन २०११-१२ योजनाअंतर्गत शासकीय गोदाम बांधकामाकरिता रु.२०,५४,०००/- इतक्या खर्चाच्या मूळ अंदाजपत्रकास मंजूरी प्रदान करण्यात आली आहे. सदर ठिकाणावरील नवीन गोदामाचे बांधकाम हे अस्तित्वातील जुने नादुरुस्त गोदाम पाडून बांधावयाचे असल्याने जुने गोदाम पाडण्यास सुरुवात केली असता स्थानिक नागरीक श्री.जन्नावार यांनी या जागेवर स्वत:ची मालकी दाखवून न्यायालयाकडून पुढील कामास स्थगिती आणल्याने गोदामाचे काम बंद होते. त्यानंतर मा.जिल्हा न्यायालयाने स्थगिती उठविल्याचे तहसिलदार, किनवट यांनी कळविल्यानंतर कामास सुरुवात करण्यात आली. प्रत्यक्ष गोदाम बांधकामास सुरुवात केल्यानंतर गोदामासाठी योग्य खोलीवर पक्का पाया मिळत नसल्यामुळे पुन्हा वरिष्ठ अभियंत्यासह पाहणी करुन घेणे इत्यादी बाबी तसेच पुन्हा नव्याने काळ्या मातीमध्ये पायाची संरचना संकल्प चित्र तयार करुन मंजूरी करुन घेण्याकरीता काही कालावधी लागला. जिल्हा पुरवठा अधिकारी, नांदेड यांनी नवीन संकल्प चित्रामुळे झालेल्या इमारतीच्या संरचना बदलाप्रमाणे रु.४३,६७,४६३/- इतक्या रकमेचे सुधारित अंदाजपत्रक प्रशासकीय मंजुरीसाठी शासनास सादर केले आहे. त्याअनुषंगाने किनवट जिल्हा नांदेड येथील गोदाम बांधकामाच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:-</u>

किनवट ता. किनवट जि. नांदेड येथील गोदाम बांधकामाच्या **रु.४३,६७,४६३/- (रुपये:- त्रेचाळीस लक्ष सदुसष्ट हजार चारशे त्रेसष्ट फक्त)** इतक्या रकमेच्या सुधारीत अंदाजपत्रकास व कामास पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सदर गोदाम बांधकाम सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे. पुन्हा सुधारीत प्रशासकीय मान्यतेसाठी मागणी करण्यात येणार नाही.

II. योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहीत निविदा कार्यपद्धती अनुसरण्यात यावी.

III. सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

२. उपरोक्त खर्च "मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष ४४०८, ०२, साठवण व वखार साठवण,१०१, ग्रामीण भागात गोदाम बांधणे कार्य्रक्रम (०१) नविन गोदामाचे बांधकाम (०१) (०१) नवीन गोदामांचे बांधकाम करणे (मुफसल) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे"या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर मान्यता वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग-१, उप विभाग ५ मधील अनुक्रमांक-१ नुसार व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक-१३४ नुसार प्रशासनिक विभागास देण्यात आलेल्या अधिकारानुसार देण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.४१२/२०१८/इमा-२, दिनांक १७/९/२०१८, नियोजन विभाग अनौ.संदर्भ क्र.२४२/१४७५, दिनांक २४/१२/२०१९, वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.७३९, दिनांक ०७/०१/२०२० आणि व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक १३/०२/२०२० रोजीच्या बैठकीत दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१३१५३२१५३३०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip Girdhar Chavan

Digitally signed by Pradip Girdhar Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food, Civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ad1667fce35440d37e8567cc278d78039b81154909a1162e319e905bd4e93b, serialNumber=f7e9a44534c5a6e0d2062d6f59ec690169fc00c18def69311f356364b1870337, cn=Pradip Girdhar Chavan
Date: 2020.03.13 15:34:44 +05'30'

**( प्र. गि. चव्हाण )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी, नांदेड.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बाधंकाम प्रादेशिक विभाग, मुंबई व औरंगाबाद.
३. वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक सरंक्षण विभाग,मुंबई.
४. उपायुक्त (पुरवठा) , औरंगाबाद.
५. जिल्हा पुरवठा अधिकारी, नांदेड.

६. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बाधंकाम विभाग, नांदेड.
८. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उप सचिव मार्फत)
११. वित्त विभाग (व्यय-१०, अर्थोपाय, अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय,मुंबई.
१२. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय,मुंबई
१३. उप महाव्यवस्थापक, नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड, शिवाजीनगर पुणे ४११००५
१४. निवड नस्ती/नापु-१६-ब.